वाशिम येथे दुय्यम कारागृह पुन्हा सुरु करण्यासंदर्भात तारेचे कुंपण घालण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-३७०२/प्र.क्र.१२७/पीआरएस-२.

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १४ फेब्रुवारी ,२००३.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/दु.का/वाशिम/२१०५/कक्ष-३,दिनांक १८.१.२००२.

२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१.

<u>शासन निर्णय:-</u> वाशिम येथे बंद असलेल्या दुय्यम कारागृहाच्या जागेवर इतर कोणत्याही व्यक्तीचे अतिक्रमण होऊ नये म्हणून तारेचे कुंपण घालणे आवश्यक आहे. त्याकरिता रु.७१,८४५/- इतका खर्च अपेक्षित असून त्या संबंधीच्या खर्चाचे अंदाजपत्रक व बाधकामाचा नकाशा शासनास सादर करण्यात आला असून त्यास शासनाने प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी विनंती कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास केली आहे.

२. वाशिम येथे दुय्यम करागृह पुन्हा सुरु करण्याकरिता तेथील कारगृहाच्या जागेवर तारेचे कुंपण घालण्यासाठी येणाऱ्या खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचा आराखडा हे कार्यकारी अभियता सार्वजनिक बाधकाम विभाग मंडळ वाशिम यांनी मंजूर केला आहे. तसेच कारागृह महानिरीक्षक यांच्या कार्यालयाने "वाशिम येथे दुय्यम कारागृह सुरु करण्यास प्रशासकीय मान्यता मंजूर करण्याबाबत शासनास विनंती केली असून त्या अनुषंगाने प्रस्तावित प्रस्तावास " प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करून वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक-. विअप्र- १००० /प्र.क्र.४६ /२००१ विनियम दिनांक ११.७.२००१ च्या आदेशान्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन, तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग पाच अ.क्र.१महाराष्ट्र

/SM

सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ च्या विवरणपत्रातील रकाना ३,४,५ व ६ मधील अटींच्या अधिन राहून शासन या आदेशाद्वारे "वाशिम येथील दुय्यम कारागृहाच्या जागेवर तारेचे कुंपण घालण्यास येणाऱ्या रु ७१,८४५/-(रुपये एकात्तर हजार आठशे पंचेचाळीस फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता मंजूर करीत आहे.

३. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (तुरुंग)" मागणी क्रमांक-एच-१३ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संमतीने तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६१/१४११/ दिनांक २०.११.२००२ च्या मान्यतेने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र. ना. माळी)

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक,पूर्व विभाग,मध्यवर्ती कारागृह, नागपूर.

अधिक्षक,जिल्हा कारागृह, अकोला.

कार्यकारी अभियंता,सा.बां.वि.जिल्हा वाशिम/अकोला.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.

महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)नागपूर.

महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी वाशिम/अकोला

वित्त विभाग(व्यय-८) मंत्रालय,मुंबई.

नियोजन विभाग(कार्यासन-१४११)मंत्रालय,मुंबई

सार्वजनिक बांधकाम विभाग(इमा-२)मंत्रालय,मुंबई

अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई

निवडनस्ती- पीआरएस-२